क्रांतिसिंह नाना पाटील यांचे मौजे कुंडल ता.पलुस जि.सांगली येथील स्मारकाच्या टप्पा-२ च्या बांधकामाकरिता निधी वितरित करण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्र. स्मारक- २०२२/प्र. क्र.१६/२९**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२,
दिनांक : १७ मार्च, २०२३.

<u>वाचा</u>:- १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.स्मारक २०२२/प्र.क्र.१६/२९, दि.०१.०७.२०२२.
२) जिल्हाधिकारी,सातारा यांचे पत्र क्र.स्मारक-२०२२/प्र.क्र.०१/का.१४ (३)२१५६,दि.२३.१२.२०२२.

**<u>प्रस्तावना</u>:-**

क्रांतिसिंह नाना पाटील यांचे मौजे कुंडल ता.पलुस जि.सांगली येथील स्मारकाच्या टप्पा-२ अंतर्गत स्मारकातील सभागृहात सिलिंग विद्युतीकरणाचे साऊंड करणे व पुतळा उभारण्याकरिता जिल्हाधिकारी,सांगली यांनी दिनांक ०६/०१/२०२२ अन्वये सादर केलेल्या रु.८०.०० लक्ष रक्कमेच्या आराखडे व अंदाजपत्रकास शासन निर्णय क्रमांक स्मारक- २०२२/प्र.क्र.१६/कार्या.२९, दिनांक ०१.०७.२०२२ अन्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. प्रस्तुत स्मारकाकरिता कोणताही निधी वितरित करण्यात आलेला नाही. आता जिल्हाधिकारी, सांगली यांच्या संदर्भाधीन क्र.२ वरील पत्रातील मागणीस अनुसरुन निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**<u>शासन निर्णय :</u>**

या शासन निर्णयाद्वारे क्रांतिसिंह नाना पाटील यांचे मौजे कुंडल ता.पलुस जि.सांगली येथील स्मारकाच्या टप्पा-२ च्या सभागृहात सिलिंग विद्युतीकरणाचे साऊंड करणे व पुतळा उभारण्याकरिता रु.८०,००,०००/- (रु.ऐंशी लाख फक्त ) इतका निधी वितरित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदरचा खर्च सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात मंजूर असलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा व तो खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

मागणी क्रमांक -ए-४,
मुख्य लेखाशीर्ष, २०५९ सार्वजनिक बांधकामे
८०- सर्वसाधारण
८००- इतर खर्च
(००) (००) (०२) राष्ट्रपुरूष/थोर व्यक्ती यांची स्मारके व पुतळे यांचे बांधकाम (कार्यक्रम)
(२०५९ ३१७७), ५३ मोठी बांधकामे

वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२२/प्र. क्र.४३/अर्थ-३, दिनांक ०४ एप्रिल, २०२२ मधील तरतुदीचे पालन करण्यात यावे. तसेच वितरीत निधी ठेव बांधकामाच्या स्वरुपात सार्वजनिक बांधकाम विभागाकडे वर्ग न करता चालू आर्थिक वर्षामध्ये स्मारकाच्या कामासाठी खर्च करण्याची जिल्हाधिकारी, सातारा यांनी दक्षता घ्यावी.

३. उपरोक्त निधीमधून खर्च करण्यासाठी, जिल्हाधिकारी कार्यालय,सांगली (सांकेतांक क्रमांक २४०१००१०३९) यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर निधीच्या

खर्चाची उपयोगिता प्रमाणपत्र महालेखापाल, मुंबई यांना सादर करण्याची तसेच महालेखापालांच्या लेख्यांशी खर्चमेळ घालण्याची जबाबदारी जिल्हाधिकारी, सांगली यांची राहील.

४. हा शासन निर्णय, प्रशासकीय विभागांना वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग पहिला, वित्त विभाग शासन निर्णय क्र. विअप्र २०१३/प्र. क्र. ३०/२०१३/विनियम,भाग-२ दिनांक १७ एप्रिल, २०१५ अन्वये प्राप्त झालेल्या अधिकारांतर्गत किंवा त्या-त्या विभागांना वेळोवेळी वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-२ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या वित्तिय अधिकारांतर्गत असलेल्या प्रकरणांबाबत देण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे. तसेच वित्त विभाग, शासन निर्णय, क्र. अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दिनांक ०४ एप्रिल, २०२२ सोबतचे परिशिष्ट मधील अ.क्र.९ मधील प्रत्येक मुद्यांची पुर्तता करण्यात आली आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३१७१६३१०३४७०७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

VITTHAL DATTATRAY BHASKAR

Digitally signed by VITTHAL DATTATRAY BHASKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=91203183610b8b491083c57020a7b10ec5090c3bdc9c99c8efa3f2550d7d6dba, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=4B40933BF4EACC8396B58075245383763AD1FF54439FD348199F9B3896BF3610, cn=VITTHAL DATTATRAY BHASKAR
Date: 2023.03.17 16:35:55 +05'30'

**(विठ्ठल दत्तात्रेय भास्कर)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपालांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मुख्यमंत्र्यांचे सचिवालय, मंत्रालय, मुंबई
३) मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय,मुंबई-३२.
४) मा.पालकमंत्री, जिल्हा सांगली यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५) अपर मुख्य सचिव (प्र.सु., र.व का.), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
६) सचिव (बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
७) जिल्हाधिकारी, सांगली
८) महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई
९) महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र-२ नागपूर
१०) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ मुंबई
११) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र-२ नागपूर
१२) जिल्हा कोषागार अधिकारी, सांगली
१३) निवासी उपजिल्हाधिकारी,सांगली
१४) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम (पश्चिम) विभाग, सांगली.
१५) कक्ष अधिकारी (कार्या-२५ / कार्या-२६), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
१६) कक्ष अधिकारी, नियोजन विभाग (कार्यासन-१४४३), मंत्रालय, मुंबई
१७) कक्ष अधिकारी (कार्यासन व्यय- ४), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१८) कार्यासन अधिकारी, (इमा-३), सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय, मुंबई
१९) निवडनस्ती (कार्यासन २९), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.